•

लौकरच तयार होत आहे

•

# बाल मानसशास्त्र

•

श्री. काणेगुरुजी व इतर अनेक नामवंत बाल मानसशास्त्रज्ञांच्या
उत्कृष्ट लेखांचा संग्रह

•

# गांधी - गीता

लेखक

अ. वि. काणे
( पण्डित काणेगुरुजी )

जे. विनायक प्रकाशन : मुंबई २८

प्रकाशक
गो. वि. जोशी
जे. विनायक प्रकाशन
मेयर बिल्डिंग : दादर मुंबई २८

*



१५ ऑगस्ट १९५९

मूल्य १ रुपया

*

मुद्रक :
यशवन्त गोपाळ जोशी
आनंद मुद्रणालय
१५२१ सदाशिव : पुणे २

श्री. चिंतामणराव देशमुख

( माजी अर्थमंत्री )

यांस

अर्पण

अ० वि० काणे

(पण्डित काणेगुरुजी)

माझ्या वडिलांचे मित्र श्री. वि. कृ. जोशी यांनीं ह्या पुस्तकाचें प्रकाशन मिळवून दिल्याबद्दल, त्यांचे आभार. तसेच श्री. अ. वि. काणेगुरुजी यांनीं त्यांना दिसत नसतांना देखील दुसऱ्यांकडून लिखाण लिहून घेऊन पुन्हा वाचून घेऊन तें पूर्ण शुद्ध करण्याचा त्रास घेतल्याबद्दल त्याचे आभार. तसेंच प्रा. रं. रा. देशपांडे (प्रा. रुईया कॉलेज, माटुंगा.) तसेंच इतर लोकांनीं उत्साहानें श्री. काणे यांना वेळोवेळी मदत केल्याबद्दल त्यांचे मी आभार मानतों.

—प्रकाशक

# निवेदन

**आदिष्टवान यथा स्वप्ने कालिदासो महाकविः**
**तथा लिखितवान प्रातर्जनोऽयम् जडधीरपि ॥ १ ॥**

आजपर्यंतचें माझें जीवन शिक्षण-प्रसार कार्यातच गेलें. माझें इंग्रजी शिक्षण वसई येथील हायस्कूलांत मॅट्रिकपर्यंतच झालें. संस्कृत श्लोकरचनेचा प्रथम प्रयत्न सुमारें वीस वर्षांपूर्वी मीं केला. त्यावेळीं देशभक्त बाळासाहेब खेर ह्यांचेवर संस्कृतांत गौरवाष्टक लिहून तें मीं त्यांना अर्पण केलें. त्या माझ्या प्रथमकृतीला प्रकाशनाचा योग आला नाहीं.

*त्यानंतर श्री. चिन्तामणराव देशमुख यांनीं महाराष्ट्राच्या आंदोलनांत मंत्रिपदाचा राजीनामा देऊन आपली उज्ज्वल देशभक्ति व त्याग व्यक्त केला त्या प्रसंगाला उचित असें त्यांचेवर संस्कृतांत गौरवाष्टक लिहिलें व त्या गौरवाष्टकाला संस्कृतांतून त्यांनीं मला श्लोकबद्ध उत्तरहि पाठविलें.*

चिन्तामणि गौरवाष्टक लोकसत्तेंत प्रसिद्ध झाल्यामुळें तें अनेक वाचकांच्या वाचनांत आलें असेलच. त्यानंतर गांधीजयंतीचे दिवशीं मीं लिहिलेलें गांधी गौरवाष्टक लोकमान्य दैनिकांत प्रसिद्ध झालें. त्यांतूनच '**गांधीगीता**' लिहिण्याचा मी संकल्प केला. संकल्पाप्रमाणें प्रस्तुत काव्य मला लिहितां आलें नाहीं. त्याला अनेक अडचणी आल्या. गेल्या दोन वर्षांपासून मला थोडें कमी कमी दिसूं लागलें व सध्या तर अंधांतच माझी गणना करतां येईल, अशा परिस्थितींत काव्यरचनेचा मी मनाला एक विरंगुळा लावून घेतला.

माझें संस्कृतचें ज्ञान, अभ्यास व वाचन अगदींच तुटपुंजे; परंतु पाठान्तरावर माझा विशेष भर. या पाठान्तर सामुग्रीचा मला श्लोक लिहिण्याच्या बाबतींत फारच उपयोग झाला. कालिदासाचें काव्य माझ्या वाचनांत आल्यावर त्याचीच मला अवीट गोडी लागली व अर्थ कळो वा न कळो कालिदासाच्या काव्याचें वाचन व पठन मी सतत चालू ठेवलें कुमारसंभव, रघुवंश ह्या काव्यांतील कांहीं सर्गहि मला तोंडपाठ येत आहेत.

पुष्पदन्तानें लिहिलेलें महिम्न स्तोत्र मी लहानपणींच पाठ केलें. हें स्तोत्र शिखरिणी वृत्तांत लिहिलेलें आहे व पुढें त्याच वृत्तांत लिहिलेलें जगन्नाथ पण्डिताचें गंगालहरी हें काव्य माझ्या वाचनांत आलें. दोन्हीहि काव्यांचें वृत्त शिखरिणी असून तीं दोन्ही स्तुतिपर काव्यें आहेत. गौरवासाठीं ह्याच वृत्ताची मी प्रथम निवड केली.

' काव्याच्या सदरांत बसेल इतकाहि **गांधीगीतेचा** विस्तार नाहीं. हें खरें आहे. लघुतम काव्यांत ह्याची फार तर गणना होऊं शकेल. महात्मा गांधी गौरवपर श्लोकरचना करावी हा माझा मूळचा उद्देश. तथापि त्याला नांव काय द्यावें हें माझें मलाच निश्चित काय तें ठरवितां येईना. एकदां वाटे, गांधी गौरव शतकम् " असेंच नांव ह्या लघुतम काव्याला ठेवावें. शेवटीं माझ्या मित्रमंडळीबरोबर चर्चा करून काव्याचें नांव " गांधीगीता " ठेवण्याचेंच अखेर ठरलें. काव्य लिहितांना तें दुर्बोध असूं नये, अवघड सन्धि-विरहित असावें व त्यांत पदालालित्य व त्यामुळें निर्माण होणारें नादब्रह्म टिकविलें जावें. अशा प्रकारें मी काव्याच्या सीमारेखा ठरविल्या. काव्य-रचना पद्धतींत अगदीं संस्कृतांतील जुन्या काव्यांचें अनुकरण करावयाचें असें मी योजिलें. संस्कृत काव्याच्या परंपरागत

आलेल्या प्रासादिक चौकटींत आधुनिक विषयाचा फोटो बसविल्यावर अशी साहित्याची नवीन तसबीर कशी खुलून दिसेल ह्याचाहि हें काव्य म्हणजे प्रयोगच आहे.

सर्व भाषांमध्यें संस्कृत ही व्याकरणाधिष्ठित भाषा आहे. संस्कृत विषयांत व्याकरणाचें माझें ज्ञान यथातथाच. व्याकरणाचा अभ्यास करून मग काव्याचा अभ्यास करण्याऐवजीं माझी उलट दिशेनें सुरवात झाली. काव्याची जशी मला गोडी वाटूं लागली, तसेंच संस्कृतांतील श्लोक माझ्या जिव्हाग्रीं रेंगाळूं लागले. व काव्यांतूनच थोडेंबहुत मी व्याकरण शिकलों. त्यामुळें माझ्या काव्यांत व्याकरणाचे प्रमाद असणे हें अगदीं स्वाभाविकच आहे.

ज्याप्रमाणें मधुपिपासू भ्रमरालि मोहरलेला सहकार वृक्ष भेटतांच त्याला टाकून अन्यत्र जाण्याची इच्छाच करीत नाहीं. माझेंहि अगदी तसेंच झालें. कालिदासाच्या काव्यरसाच्या प्राप्तीनें माझी तृप्ति झाली. निवेदनाच्या आरंभींच्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें महाकवि कालिदासाकडून मला प्रेरणा होत असे. ह्यावर सर्वांनींच विश्वास ठेवावा असा माझा आग्रह नाहीं. तथापि त्याचा पडताळा म्हणून माझ्या प्रस्तुत काव्यांतील मंगलाचरणांतील शेवटले दोन श्लोक त्याचें उदाहरण म्हणून निर्देश करतां येतील.

दहावी व अकरावी इयत्तेंत क्रमिक पुस्तकाशिवाय संस्कृताचे शिक्षक कांहीं सुभाषितें व आकलन उतारे म्हणून विद्यार्थ्यांना देत असतात. असे उतारे फळ्यावर लिहून देण्यांत एकतर वेळ मोडतो आणि दुसरें असें कीं, फळ्यावरून लिहून घेतांना विद्यार्थ्यांकडून तो मजकूर अगदीं शुद्ध लिहून घेतला जात नाहीं. दहावी व अकरावी ह्या दोन्ही इयत्तांसाठीं संस्कृत पुरवणी अभ्यास म्हणून प्रस्तुत काव्याचा उपयोग करून पहावा

अशी माझी संस्कृतच्या अध्यापक वर्गाला विनंति आहे. श्लोक शिकवितांना अर्थाबरोबरच विद्यार्थ्यांना व्याकरण शिकवावें आणि मग श्लोक शिकवून झाल्यावर सर्व वर्गाकडून श्लोक म्हणून घ्यावेत. अशा रीतीनें काव्याच्या नादब्रह्मानें वर्ग दुमदुमून सोडावा. अशानें संस्कृतचे संस्कार होऊन त्या भाषेची विद्यार्थ्यांना हळूं हळूं गोडी वाटूं लागेल. तसेंच विषयही आधुनिक असल्यामुळें विद्यार्थ्यांना काव्याचा रसास्वाद अनुभवता येईल. शिक्षकवर्गाकडून प्रस्तुत काव्यासंबंधानें ज्या कांहीं उपयुक्त सूचना येतील त्याप्रमाणें पुढील आवृत्ति काढण्याचा योग आल्यास त्यांत अवश्य सुधारणा करतां येतील. त्याचप्रमाणें संस्कृत काव्याबद्दल प्रेम व आदर असणाऱ्यांनीं प्रस्तुत काव्याविषयीं मनमोकळेपणानें आपले अभिप्राय कळविल्यास त्यांचा मी ऋणी राहीन. माझी प्रस्तुत अल्प काव्य-कृति लोकादरास पात्र झाल्यास महर्षि अण्णासाहेब कर्वे, लोकमान्य टिळक, चिन्तामणराव देशमुख ह्यांच्यावर लिहिलेलीं गौरवाष्टकें व मॉंटेसरी पुरस्कृत बालमानस शास्त्रांतील श्लोक व इतर स्फुट श्लोक प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे.

*कुरुक्षेत्र संस्कृत विश्व-परिषदेस मी गेलों होतों. त्यावेळीं तेथील पंडितांना मी माझ्या काव्यांतील कांहीं श्लोक म्हणून दाखविले. ते त्यांना फार आवडले असल्याचें मला दिसून आलें. तसेंच हें काव्य चांगलें झालें आहे, असा अभिप्राय श्री. चिन्तामणराव देशमुख यांनीं दिला आहे, हें नमूद करण्यास मला आनंद वाटतो. तसेंच राष्ट्रपतींनीं प्रस्तुत काव्यास धन्यवाद दिले आहेत.*

माझ्या पराधीन परिस्थितींत सौ. प्रमिला चौबळ आणि सौ. नलिनी

प्रधान या दोघी भगिनींचें कुरुक्षेत्रीं प्रवासांत अमोलिक सहाय्य झालें तें मी कधींहि विसणार नाही. ' कुरुक्षेत्र संस्कृत विश्व-परिषदेच्या ' केसरींतून प्रसिद्ध झालेल्या अहवालांत पुढील आशयाचा मजकूर प्रसिद्ध झाला.

*" संस्कृत काव्यगायनांत महाराष्ट्र अग्रभागीं आहे. याची सत्यता वसईचे पंडित कर्णे गुरुजी ह्यांनी उपस्थित पण्डितांना सिद्ध करून दिली.*

गांधी-गीतेच्या वाचकवर्गास मला एक प्रेमाची सूचना करावीशी वाटते कीं, गांधींच्या जीवनांतील राजकारण हा एक भाग व सत्य अहिंसा वादी गांधी हा; दुसरा भाग राजकारणांतील घडामोडी हा काव्य-विषय होऊं शकणार नाहीं. त्याचें कारण असें कीं, ते बुद्धिनिष्ठ असून त्याला स्थायीभाव नसतोच. राजकारणाचा भाग मुद्दाम वगळून, किंवा त्याला फार महत्त्व न देतां महात्माजींच्या गुणांचें वर्णन केलें आहे. महात्माजींच्या चरित्रांत त्यांचें आफ्रिकेंतील कार्य फार महत्त्वाचें आहे परंतु आफ्रिका खंडांतील ओसाड वाळवंटांची आठवण होऊन माझी स्फूर्ति तेथेंच शुष्क झाली, म्हणून तो भाग अपूर्णच ठेवावा लागला.

*माझ्या काव्याची हस्तलिखित प्रत श्री. चिन्तामणराव देशमुख ह्यांचेकडे तपासण्याकरिता मी पाठविली. त्यांनी मोठ्या आनंदानें काव्य तपासण्याचें किचकट काम फारच तत्परतेनें व हौसेनें केलें, त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.*

त्याचप्रमाणें गिरगांवांतील आ. ए. सो.च्या शाळेचे संस्कृतचे प्राध्यापक रानडेशास्त्री ह्यांनींहि आपला अमूल्य वेळ खर्च करून माझें काव्य

तपासण्याची तसदी केली घेतली, ह्याबद्दल मी ह्यांचाहि आभारी आहें. ह्या काव्याच्या हस्तलिखित प्रति कंटाळवाणें काम कु. कुसुम सामंत श्री. म. वि. फडके व श्री. भै. दि. गांगल व द. ना. करमरकर ह्यांनीं केलें. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. ह्याशिवाय गांधी–गीता समितीचे अध्यक्ष डॉ. ग. भि. परुळेकर, उपाध्यक्ष डॉ. एल्. एस्. गव्हाणकर, श्री. ना. के. शेंडे, श्री. रा. ह. तेंडुलकर वगैरे माझ्या मित्रमंडळींनीं जें अमौलिक सहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. श्री. विष्णु कृष्ण जोशी ह्यांनीं आपुलकीनें काव्य प्रकाशनाचे बाबतींत सर्वतोपरी साह्य केलेंच आहे. श्री. करसनदास ताराचंद [ वसई स्टेशन ] व अमृतलाल कल्याणजी [वसई] यांनीं मला विशेष आर्थिक साह्य केलें. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून मला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साह्य केलें आहे ह्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहें, तसेंच जे. विनायक प्रकाशनचे मालक श्री. गो. वि. जोशी यांनीं आमच्याकडून प्रस्तावनेला उशीर झाला असून देखील आठ दिवसांत १५ ऑगस्टपर्यंत पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल त्यांचे आभार.

ज्याच्या कृपेनें मुके बोलूं लागतात, पंगू गिर्यारोहण करूं शकतात, दृष्टिहीनाकडून काव्य लिहिलें जातें, त्या दयाघन प्रभूचे चरणीं लीन होऊन निवेदन येथेंच पुरें करतों.

पारनाका वसई,
जिल्हा ठाणें [ मुंबई ]

**काणे गुरुजी**
गांधी-गीता लेखक

# चार शब्द

" देव राहती स्वर्गामध्यें
आम्ही येथें भूमीवरती
कुणा पुसावें ? काव्य गोड वा
अधिक गोड तें तुमचें अमृत ? "

या अर्थाचें एक संस्कृत सुभाषित आहे. त्यांत वर्णिलेलें संस्कृत भाषेंत रचलेल्या काव्यांचें पर्यायानें संस्कृत भाषेचें वैभव अत्युक्त निश्चित नव्हे. परंतु, हे तिचे वैभवाचे दिवस कधींच संपले. आज तिची गणना 'मृतभाषा' म्हणूनच करणें उचित होईल, असा पुष्कळांचा प्रामाणिक ग्रह आहे. 'जी रोजच्या व्यवहारांत वापरली जाते ती जिवंत, जी तशी वापरांत नाहीं ती मृत' या व्याख्येचा आश्रय करून ठोकळ स्वरूपाचीं विधानें करणारांच्या दृष्टीनें संस्कृत भाषा मृतच असणार परंतु जी भाषा आजच्या भारतीय भाषांना नित्य नूतन शब्दांचा संग्रह पुरवीत आहे, जी त्याचें अर्थप्रकटनाचें बल वाढवीत आहे, त्यांच्या विविधांगी जीवनाच्या समृद्धीसाठीं संजीवनीचें कार्य करीत आहे, ती स्वतः मृत आहे, हें विधान कुणासहि विचारांतीं कसें पटावें ?

आजहि अनेक संस्कृतप्रेमी सरस्वतीची सेवा या भाषेच्याच द्वारां करीत आहेत. स्वतंत्र भारतांत अशा वाग्देवतापूजकांची संख्या दिवसानुदिवस वाढत जाईल अशींच प्रसादचिन्हें दिसत आहेत. प्रस्तुतच्या गांधी गीते ' चे लेखक स्वतः अंधत्वानें पीडित आहेत. परंतु या आपत्तीनें ते

गांगरून गेले नाहींत. जगाच्या इतिहासांत शतकें लोटून गेल्यानंतर केव्हां तरी एकदा जन्मास येऊन आपल्या चरित्रानें समग्र मानवतेला उजळा देणाऱ्या थोर विभूतींपैकीं एकीचें गुणगान त्यांनीं मोठ्या भक्तिभावानें या 'गांधी गीता' पुस्तकांत केलें आहे. गाधी गीता रचनेसाठीं त्यांनीं निवडलेली भाषा संस्कृत आहे, हेंहि औचित्यपूर्णच आहे. स्तोत्रांसाठीं आवश्यक तें पदलालित्य व वृत्तसौन्दर्य यांविषयींचें वळण या भाषेंत शेकडों वर्षांपूर्वींच पडून गेलें आहे.

पूजनीयांची पूजा आणि आदरणीयांविषयींचा आदरभाव ज्यामुळें वाढीस लागतील अशा सर्वच रचना अभिनंदनास पात्र होत. तरुण पिढीच्या चारित्र्यसंवर्धनास उपयुक्त असें कार्य या स्तोत्राचे लेखक श्री. अनंत विष्णु काणे यांनीं केलें आहे. त्यांच्या प्रयत्नाचें दुसरेंहि एक महत्त्वाचें फल आहे. तें म्हणजे संस्कृतांत रचना करणें. प्रयत्न करण्याची तयारी असल्यास, कठीण नाहीं, अशी नवीनांची खात्री होईल हें.

श्री. काणे यांच्या अशा या अत्यंत उपयुक्त कार्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून हे चार शब्द संपवितों.

लोकमान्य नगर, मुंबई १६
२७ जुले १९५९

र. रा. देशपांडे
प्रा. रुईया कॉलेज, माटुंगा.

## अथ मंगलाचरणम् ।

अयि गजानन, विघ्नविनाशक ।
त्वमसि सर्वमनोरथपूरकः ॥
शिवसुतः शुभमंगलकारकः ।
वसतु नामसुधा तव मन्मुखे ॥१॥
अमितदोषयुतं तरलं मनः ।
मतिरपि स्थिरभावविवर्जिता ॥
मधुपवृत्तिवृतं त्वधुना मनः ।
पिबतु ते गुणकीर्तिसुधारसम् ॥२॥
वाग्देवि शारदे दुर्गे गृहाण प्रणतिं मम ।
महात्मनश्च चरितं लेखनाय समुद्यतः ॥३॥
क्वचाल्पमतिकासारः क्व गांधीचरितार्णवः ।
काव्यकम्बलमेतन्मे गौरी गौरवतां नयेत् ॥४॥
प्रणम्य शिरसा देवं सुतं गंगाधरस्य च ।
बालार्कं बालतिलकं स्थितप्रज्ञं च पंडितम् ॥५॥
असंतोषस्य जनकं सत्यभामाप्रियंकरम् ।
स्वराज्यमंत्रदातारं दास्याद्देशविमोचकम् ॥६॥

लोकमान्यमसामान्यं भगत्सिंगं तथैव च
हुतात्मनां त्रयाणां च कान्हेरे—कुलदीपकम् ॥७॥
चाफेकरद्युतिकरौ भ्रातरौ तरुणौ च तौ ।
बाबू गेनुं युवानं तं करोमि प्रणतिं पुनः ॥८॥
संजातकर्वेकुलभूषणं या माता मदीया सुभगा च लक्ष्मीः ।
विष्णुः पिता मे श्रुतवान् गुणज्ञो गीर्वाणवाणीकृत प्रेमभावः ॥९॥
स गार्ग्यगोत्रप्रभवः सुवंशो नारायणः ख्यातयशो गुरुर्मे ।
सौजन्यमूर्तिः खलु शान्तमूर्तिर्विद्या प्रदाने निपुणस्तथैव ॥१०॥
शाण्डिल्यगोत्रोद्भवलब्धवर्णे विख्यातकाणेकुलदान्तगेहे ।
अहो शुचीनामपि मंगलानामनंतनाम्नो मम जन्मजातम् ॥११॥
षड्वर्ष-जातस्य ममैव नष्टं तत् पितृवात्सल्यविलोलसौख्यम् ।
किशोर कालोचित सौख्यपुष्पे पितुर्वियोगोऽनलपात एव ॥१२॥
अंधः कविस्तद् गुणवाहि काव्यं दोषो हि दोषोद्भव एवमुक्तम् ।
निर्गंधपुष्पं सहजं यदिस्यात् सुमत्त्वभावं न जहाति नूनम् ॥१३॥

卐 卐 卐

# अथ गांधीमहिम्नः स्तोत्रम् ।

जगन्मांगल्यस्य प्रचुरतरबुद्धेश्च विषयः ।
अहिंसायाबंधुः स करुणगुणैः शाम्यति रिपून् ॥
अगाधज्ञानाब्धिः सुगुणसुमनाराम इव सः ।
महात्मासौ दीनोद्धरणकृतकामो निरलसः ॥ १ ॥
क्वचित् टाटाबिर्लासदनकृतवासो मुनिवरः ।
निवासस्तस्यापि क्वचिदुटजगर्भेऽतिकृपणे ॥
क्वचित् साम्राज्यस्य प्रतिनिधिवरैः सार्धमपि च ।
विवादेऽसौ मग्नः क्वचिदपि च सामान्यपुरुषैः ॥ २ ॥
अथादिष्टं तेनापि च नवममोघं व्रतमिदम् ।
यदेतन्मानार्हं मृदुसुममसं वा पविसमम् ॥
मृदुत्वे काठिण्यं प्रभवति हि सत्याग्रहविधौ ।
अतर्क्यं सामर्थ्यं जगति विपरीतं च महताम् ॥ ३ ॥
शिवान्यायप्रीतिः सहजमनुजासक्तशुभदा ।
प्रतिष्ठा तस्यास्तु प्रभवति विकासाय हि नृणाम् ॥
ध्रुवं सत्यन्यायाभरणयुगुलं शान्तिसुखदम् ।
उभौ सत्यन्यायौ शशिदिनकरावेव जगतः ॥ ४ ॥

गृहं यान्ति श्वानः पुनरपि रमन्तेऽपि सुतराम् ।
तथास्पृनां शत्रुः कृतसुखनिवासोऽपि रमते ॥
स्मृतेर्हेतुः प्रायो विरचयति यद् मानवहितम् ।
अतोऽस्पृश्येभ्योऽसौ हरिजनपदं यच्छति शुभम् ॥ ५ ॥

प्रकृत्या दुष्टानां कुमतिगदसंत्रस्तमनसाम् ।
असौ वैद्यो नारायण इव पुनर्हन्ति च गदान् ॥
यथा होता ह्यग्नौ क्षिपति हवनीयं हविरपि ।
तथासौ वैरित्वं दहति च समूलं खनति च ॥ ६ ॥

शठे शाठ्यं न्यायो न हि समुचितो वा बहुमतो ।
न तत् वैरस्यापि प्रभवति समुन्मूलनविधौ ॥
वरं वैरस्यापि प्रशमनविधेर्वैरमरणम् ।
शठे सत्यं योगात् खलहृदि शिवं योजयति सः ॥ ७ ॥

असौ वारंवारं कथयति च मानुष्यमहतीम् ।
प्रतिष्ठा विश्वस्याधिवसति च सत्ये पुनरपि ॥
वे सत्ये नूनं निवसति जगद्भूतिरचला ।
महात्मा व्याक्रोशैः प्रवदति च सत्यस्य गुणिताम् ॥ ८ ॥

रथः पृथ्वी साक्षादभिनवजगत् यंत्रयामिता ।
अहो यंत्रारूढा नवभुवनभूतिर्हि त्रिफला ॥
अपौर्वात्य –प्रज्ञाजनित नवसृष्टेः परिकरः ।
स तूलप्रायोगैरतुल – सुखशान्तिं रचयति ॥ ९ ॥

महादुष्टान् व्रात्यानपि च मतिहीनान् बहुखलान् ।
समुद्धर्तुं पापान् प्रभवति महात्मा निजबलैः ॥
महारोगग्रस्तान् निरयपतितान् भ्रष्टचरितान् ।
करालंबेनैव प्रचुर सुखशान्तिं जनयति ॥ १० ॥

यथा कर्षत्येवं प्रचुरजलराशीनुडुपतिः ।
प्रजाभ्यस्ताभ्यश्च प्रचुर – धनराशीन् नरपतिः ॥
असौ चंपारण्ये कृतबहुत – विद्याधनपतीन् ।
स लक्ष्मीपुत्राणां सकल – बलमाकर्षति तथा ॥ ११ ॥

अजादुग्धे प्रीतिः स्वकृतवसने प्रीतिरधिका ।
हरौ तस्य प्रीतिर्हरिजनसमाजेऽधिकतरा ॥
प्रशान्तप्रवृत्तेर्जलधिरिव गंभीर – हृदयम् ।
शरच्चंद्रज्योत्स्नाधवलविमलं तस्य चरितम् ॥ १२ ॥

यथा तारानाथो धवलकिरणैर्भाति गगने ।
वने गंधाढ्यो वा परिमलगुणैश्चंदनतरुः ॥
यथा हंसश्रेष्ठः स्फटिकधवलैश्चापि सलिलैः ।
महात्मा पूतात्मा धृतसितपटैर्भाति च तथा ॥ १३ ॥

यदभ्यासैर्ध्यानै रघुपतिगुणासक्तमनसा ।
महात्मा प्राप्नोति प्रचुरचिरशान्तिं च समताम् ॥
पुराणे यो भावः पुनरपि कुराणे स महताम् ।
समीभूताद्दृष्टिर्गणयति न भेदं क्वचिदपि ॥ १४ ॥

समुत्पत्तिः प्रायो विपुलविभवानां च हि नृणाम् ।
श्रमाद्दीर्घायुष्यातिशयसुखशान्तेरपि तथा ॥
सुखारंभो धर्मे न हि न हि स धर्मे निवसति ।
श्रमे राष्ट्रोत्कर्षः प्रवदति महात्मा हृदयतः ॥ १५ ॥

अमित्रे मित्रत्वं दलितजनवर्गेष्वभिरुचिः ।
मुखे सीताकान्तो हृदि वहति वात्सल्यसरिता ॥
शुभे भाले भाति श्रमजनितघर्मस्य वलयम् ।
शुचीनां साम्राज्यं मनसि च तथा देहनगरे ॥ १६ ॥

कृतो सेवाग्रामः समुचितमनेनाश्रमपदम् ।
कृतैः सेवा पुण्यैः परिहसति यद् विष्णुभुवनम् ॥
अहिंसायाः कुञ्जे विकसति मनःशान्तिकुसुमम् ।
समाधानं वृत्तेस्तदुपरि फलं मंगलमयम् ॥ १७ ॥

स सत्यस्य त्रातामितहरिजनानां च हि पिता ।
स नेता नेतॄणामभिनवजगत् ज्ञानसविता ॥
स तेजस्वी वक्ता नवयुगमतानां च जनिता ।
विधाता मूल्यानां समुचितनवानां कलियुगे ॥ १८ ॥

हरेः संजातोऽसौ हरिजनसमाजश्शरणतः ।
त्रयाणां वर्णानां स च भवति भृत्यो गुणवशात् ॥
कनिष्ठोऽस्मद्बंधुः कथमिव स हीनः खलु भवेत् ।
स सद्योऽस्पृश्यत्वं रविरिव तमो नाशयति च ॥ १९ ॥

अहिंसालंकारं सदयहृदये धारयति सः ।
सतां सत्यं कण्ठस्य हि भवति तन्मंडनमिव ॥
स सद्यः सद्भावैर्जयति जनचेतांसि जगतः ।
दरिद्राणां सेवा स्वगियमिव हस्ते विलसति ॥ २० ॥

असौ ग्रामं ग्रामं प्रविशति पदा मोदभरितः ।
यतो ग्रामोत्कर्षो जनपदविकासाय भवति ॥
पुराणां समृद्धिः पुनरपि हि सा ग्रामविवशा ।
सुसंपन्नो ग्रामो जनयति सुराज्यं हि सुतराम् ॥ २१ ॥

स वात्सल्यात् वत्सोऽनुसरति च धेनुं च जननीम् ।
विशेषोस्या धेनोरनुसरति वत्सस्य पदवीम् ॥
स सौम्यः प्रकृत्या सहजमृदुभावार्द्रहृदयः ।
दयासिंधुं मन्ये मिलति ननु कारुण्यसरिता ॥ २२ ॥

वरं कर्माचारो यदपि च फलासक्तिरहितः ।
पुरा कृष्णेनैवं वचनमपि गीतासु कथितम् ॥
असौ सेवाधर्मे भ्रमर इव पद्मेच रमते ।
ऋते सत्याद्धर्मं न हि न हि स जानाति परमम् ॥ २३ ॥

व्यतीतं तेनायुः सततमपि सत्याग्रहविधौ ।
कृतं सत्यं साध्यं पुनरपि कृतं साधनमिव ॥
अहिंसाशस्त्रेण प्रबल रिपुभावं जयति सः ।
तृणेनैवं कार्यं भवति हि सतां सत्यमपि तत् ॥ २४ ॥

स्थितप्रज्ञो योगी युगपुरुषमालामणिरसौ ।
विरोधे संजाते ध्रुवमतिरसौ निर्णयपदे ॥
विरक्तः संसारे ननु नवतुकाराम इव सः ।
जगत्कल्याणार्थं सततमपि साधुर्हि यतते ॥ २५ ॥

यदेतत् सत्यस्य व्रतमतुलपुण्याय भवति ।
यतः सत्यं लोके नयति च नरं गौरवपदम् ॥
यतः सत्यं स्वर्गस्य च सुलभसोपानमिव तत् ।
ततः सत्याचारं पवन इव गंधं स तनुते ॥ २६ ॥

यथा ग्रीष्मे सूर्यः पिबति विपुलं सिंधुसलिलम् ।
पुनर्मेघो भूत्वा मितशतगुणैर्वर्षति जलम् ॥
वणिग्भ्यः श्रीमद्भ्यो द्रविणमपि गृण्हाति विपुलम् ।
असौ दीनेभ्यस्तद्धनमपि ददात्येव च तथा ॥ २७ ॥

न विष्णुर्वैकुंठे स तु वसति चांघस्य हृदये ।
न शंभुः कैलासे स तु वसति रोगार्तहृदये ॥
न देवः प्रासादे स तु वसति भक्तस्य हृदये ।
न वा दम्भे धर्मः, स हि वदति सत्ये वसति सः ॥ २८ ॥

ऋतं खल्वेदं वै श्रुतिवचनसारं हि परमम् ।
ततश्चार्सो सत्यर्पितमकलभावैकहृदयः ॥ ३७ ॥
प्रपूर्यंते कामा हरिचरणपद्माश्रितवताम् ।
हरिः सत्यं सत्यं चिरसुखनिधानं हरिरपि ॥
रमाकान्तः शान्तो भृगुचरणपद्मं हृदि यथा ।
तथाचार्यो सत्यं हृदयकमले धारयति च ॥ ३८ ॥
विना विद्यां लोके मनुजचरितं व्यर्थमपि च ।
विना कांतां गेहं यदपि च हि कान्तारसदृशम् ॥
विना वित्तं कार्याण्यपि विफलतां यान्ति भुवने ।
विना सत्यं व्यर्थं भुवनमिति तस्यापि वचनम् ॥ ३९ ॥
बृहद्भागो हैमस्य च सलिलगर्भेऽधिवसति ।
लवप्रायो भागस्तरति च जलस्योपरि यथा ॥
सतां स्वान्तस्तेजो नयनविषयो नैव च तथा ॥
न हि ज्ञातुं शक्यं सपदि च सतां गूढचरितम् ॥ ४० ॥
मया चान्धेनैवं रचितमपि भक्त्या लघुतरम् ।
इदं किञ्चित्काव्यं रसिकजनतोषाय भवतु ॥
तदीये हृद्पद्मे मम हृदयभृंगो नु रमताम् ।
चरित्रं तस्यैवं भवतु चिरसौख्याय जगतः ॥ ४१ ॥

卐 卐 卐

## गौरवश्लोकाः

प्रचुरगुणनिधानं सृष्टिशान्तेर्विधानम् ।
कृतहरिजनसेवाप्राप्तकीर्तिर्महात्मा ।।
अगणितदलितानां मोहनः सौख्यदाता ।
क्षुधितहरिजनानामन्नदाता पितेव ।। १ ।।
अथ परवशताया मानवाधिष्ठितायाः ।
सकल भुवनवैरस्यान्तकोयश्च जातः ।।
बहुलतर जनानां दुर्बलानां सखा सः ।
परहितरतभावो देहभावो न तस्य ।। २ ।।
खलपतितजनानां दुःखभाजां सुहृद् यः ।
अमतिकुमतिवृत्तेर्दुर्जनानां नियन्ता ।।
अपि च विषयवाञ्छाकर्दमग्रासितानाम् ।
विषयपतितनृणां तारकः स्वर्गदाता ।। ३ ।।
कलिमलदहनानां दर्पणो दर्शनीयः ।
क्षपितकलिकलंकः पावनो मोहनोयः ।।
असुखजनितदाहात् संसृतौ त्रस्तजन्तोः ।
शमयति परितापं चंद्रिकाभिः शशीव ।। ४ ।।

मंद्यहृदयपद्माधिष्ठितां देशभक्तिम् ।
स्मरति सततमेव भ्रातृकल्याणमेवम् ॥
स्मरति सततमेव प्राणशक्त्या स्वदेशम् ।
न हि न हि रिपुभावस्तस्य हृन्मंदिरेऽपि ॥ ५ ॥

अपि च विविधप्रान्तप्रोक्तसेवा हि तेन ।
कृतसमुचितमाना शूद्रसेवा विशिष्टा ॥
स्वशिशुमलपटानां क्षालनस्यैव सेवा ।
न भवति ननु मातुर्गौरवायैव किं सा ॥ ६ ॥

मनुजसृजनतंत्रे पूर्णता स्रष्टुरेव ।
परसुखरतवृत्तिस्त्यागधर्मो विशेषः ॥
पददलितविकासायैव सेवा तथा च ।
नयति च मनुजं तं पूर्णतां तूर्णमेव ॥ ७ ॥

त्रिभुवनचिरसौख्यप्रोक्ततारापतिः सः ।
पददलितजनानां शङ्करः शीतलेन्दुः ॥
कठिण जटिलकाले धीररत्नाकरोऽसौ ।
वहति धवलकीर्तेर्जाह्नवी तद्गुणानाम् ॥ ८ ॥

अवनिपतिततोयं निम्नगामीलनाय ।
प्रभवति ननु पश्चादब्धिसंयोगशीलम् ।।
अपि च सकलदेशासक्तलोकोत्तमानां ।
परमसुखदधन्यं स्थानमेकं महात्मा ।। ९ ।।

प्रकटजनसभायां मोहने भाषमाणे ।
भवति हि जनसंघश्चित्रबद्धस्थितश्च ।।
श्रुतिसुभगवचोभिः स्वान्तभावार्द्रवाक्यैः ।
जनपदजनवृंदं मंत्रमुग्धं करोति ।। १० ।।

प्रचुर विमलकीर्तिर्गोखले कृष्णसूनुः ।
स भवति गुरुवर्यो वाक्पटुर्मोहनस्य ।।
अपि च शुभतराशीर्वादलब्धेन तेन ।
गुरुरपि परिभूतो जातु शिष्योत्तमेन ।। ११ ।।

अविरतजनसेवाख्यातनामाभवद् यः ।
हरिजनकृतसेवाश्रान्ततृप्तो महात्मा ।।
अनलसकृतसेवा देशसेवैव पूज्या ।
जनपदकृतसेवा देवसेवैव धन्या ।। १२ ।।

अपि च कलियुगे हि त्यागयोगो विशेषः ।
सहजसुलभसेवास्वर्गसोपानमार्गः ॥
सुखदमधुरचित्तप्रीतिसंगस्तथोक्तः ।
जनयति सुखशान्ति मर्त्यलोके महात्मा ॥ १३ ॥
ननु नरकनिवासः पारतंत्र्यं नराणाम् ।
समुचितमपसारः साधितस्तस्य तेन ॥
अथ परवशताया बन्धनं येन भग्नम् ।
न पिहितमपि तस्य स्वर्गधामैव नूनम् ॥ १४ ॥
वसति कठिणभावः सज्जनानां मृदुत्वे ।
अपि च कठिणतायामेकभावो मृदुर्हि ॥
चरितमपि हि तेषां लोकबुद्धेरतीतम् ।
दिनमपि जगतो यद् सा निशा सज्जनानाम् ॥ १५ ॥
हरिजनसुखभावासक्तदृष्टिर्महात्मा ।
पदहतदलितानां जीवने निर्झरो यः ॥
अविरतकृतसेवाराशिभिः प्राप्तपुण्यैः ।
अमितजनहितानां साधको यश्च जातः ॥ १६ ॥
प्रचुर नरवराणां मानदण्डो महात्मा ।
विभवमदगजानां सौम्यशार्दूल एव ।

गजमदसत्ताधारिणां सार्वभौमान् ।
नमयति यतिरेको पादपान् वायुरेव ।। १७ ।।
अगणित – जनजातिप्रोक्त भेदान्तको यः ।
परहितरतवृत्तिः सर्वधर्मैकभावः ।।
सकलभुवनसञ्चितशान्तिधर्मस्य मित्रम् ।
तपति च खलु लोके धर्ममार्तंड एव ।। १८ ।।
जयतु जयतु देशोद्धारको पावनात्मा ।
जयतु जयतु दीनक्लेशनाशो हुतात्मा ।।
जयतु जयतु सम्राट् शान्तिदेवो महात्मा ।
जयतु जयतु सीतानाथभक्तो महात्मा ।। १९ ।।

卐 卐 卐

## मंगालाष्टकम् ।

सौराष्ट्राभरणं बभूव सुतरां दाता स्वराज्यस्य नः ।
'ओता' नाम पितामहोऽपि नृपतेर्जातो हि मंत्री महान् ॥
नप्ता तस्य च दान्तशान्तहृदयो विख्याततन्मोहनः ।
तत्वज्ञान खनिस्तथा च विदुषां विद्वानसाधारणः ॥ १ ॥
पूतात्मा मनमोहनो मुनिवरो मोहाद् विमुक्तोऽपि सः ।
येनैवं ननु नीयते हरिजनो मानुष्ययोग्यं पदम् ॥
साक्षात् शान्तिरसायनस्य जलधिः किं कौमुदी शीतला ।
दास्याद्देशविमोचकोऽपि सततं देशस्य दासो महान् ॥२॥
प्रासादो रुचये भविष्यति कदा विस्तीर्णहर्म्ये रुचिः ।
कुग्रामेऽपि च घोरवन्यभवने वासोऽपि भग्नोटजे ॥
शीतोष्णे:समभाव एव महतां दुःखे सुखे चैकता ।
द्रव्यस्यागमनं प्रयाणमपि तत्तोषाय रोषाय न ॥ ३ ॥
धन्यासापि च देवकी भगवती जातेन कृष्णेन वा ।
कौसल्या प्रभुरामचन्द्रजननी धन्यापि जाता सती ॥
शर्मिष्ठा पुरुजन्मना च सुभगा धन्या ययातेः प्रिया ।
कस्तुर्बाधवजन्मना च पुतला माता च धन्या तथा ॥४॥

सत्याधिष्ठितवृत्तिबद्धसकलव्यापारदेहस्य च ।
सत्यं सत्यविशेषदुस्तरतरज्ञानस्य लाभाय च ॥
दिव्यैर्दिव्यतरैः प्रयोगविधिभिः श्रान्त श्च क्लान्तः सदा ।
शुश्रूषाकृतलब्धवर्णपुरुषो नाताल-युद्धेऽपि च ॥ ५ ॥

कस्तुर्बारमणो रिपुप्रशमनो देशाग्रिमंमोहनः ।
एतत् स्यादपि पावनं च चरितं कल्याणकारं शिवम् ॥
देशक्लेशनिवारणस्य विपुलं शन्नः करोत्वेव तत् ।
देशव्याप्तसमस्तजातिविवशां हिंसां हिनस्तीव सः ॥ ६ ॥

जिव्हाग्रेऽपि च नृत्यतीव सरला भाषासखीसुन्दरी ।
साक्षात्तस्य मुखाम्बुजे निवसति श्रीशारदा सौख्यदा ॥
वाणी तस्य हि चार्थपूर्णमधुरा सुस्पष्टतेजस्विनी ।
सर्वं सिध्यति मौनयोगविधिना वागर्थसिद्धिस्तथा ॥ ७ ॥

योगी मोहनदास एव सुगुणो वाचस्पतिर्बुद्धिमान् ।
एतन्मोहन पादपद्मयुगुलं वन्दे विनम्रोऽप्यहम् ॥
दग्धं चापि हि मोहनेन सकलं वैरत्वबीजांकुरम् ।
कस्तुर्बापतये स्वराष्ट्रगुरवे भूयश्च तस्मै नमः ॥ ८ ॥

अस्ति प्रतीच्यां दिशि भूविभागो धृतार्धचंद्राकृति सदृशो यः ।
रत्नाकरक्षालित पादपद्मः ख्यातो हि तन्मोहन जन्मनैव ॥१॥
बभूव यो भारतभाग्यसूर्यः सौराष्ट्रदेशाभरणं च मोहनः ।
स्वदेशप्रेमादरवर्धको यः स्वातंत्र्यदातापि च शान्तिदूतः ॥२॥
शुचिस्मितोऽसौ ननु सत्यधर्मा सत्यव्रतः सात्त्विकभावशीलः ।
हिनस्ति हिंसां मदगर्वितां यः शरीरबद्धः खलु शान्तिदेवः ॥३॥
दर्पानुलिप्तां परकीयसत्तां रक्तप्रदिग्धामितभोगभोगाम् ।
ध्रुवं ह्यहिंसासुमनायुधैस्तां स्वदेहदण्डैः शकलीकरोति ॥ ४ ॥
प्रवर्तितो दीन कृषीवलेभ्यः क्षुत्पीडितेभ्यः श्रमजीवितेभ्यः ।
किञ्चिद्धनप्राप्तिविशेषहेतो गृहे गृहे तेन हि सूत्र यज्ञः ॥ ५ ॥
दारिद्र्यदोषैरपिहन्यमानास्तमोगुणानामपिभाजनं ये ।
तेषां जनानामपि दुःखभाजां दुःखानि दूरीकृतवान् बभूव ॥ ६ ॥
सत्यं हि यत् तद् छलनानुविद्धं मतामभिप्राय इति प्रसिद्धः ।
असत् प्रवृत्तेः परिवर्तनाय कृतानि दिव्यानि महात्मनैव ॥ ७ ॥
धर्मात्मना तद्दलिताख्यवर्गः प्राणव्ययेनापि हि येन सेवितः ।
देहावसाने सति भारतीया निमज्जमाना इव शोकसिंधौ ॥ ८ ॥

卐 卐 卐

## सुधाबिंदवः

न खलु न खलु देशद्वेषबाधा नराणाम् ।
न खलु न खलु देशद्रोहरोगोऽपि तेषाम् ॥
न खलु न खलु देशप्राणसंहारलोभः ।
न खलु न खलु भूयादेशभक्तेर्विलोपः ॥ १ ॥
न खलु न खलु दीनद्रव्यशक्तेः पिपासा ।
न खलु न खलु चासृक्पानलिप्सा विलोला ॥
न खलु न खलु रक्तासक्तभोगैकतृष्णा ।
न खलु न खलु भूयाब्दुद्धिभेदो बुधेषु ॥ २ ॥
भव भव मनुज, त्वं शत्रुदेवस्तदुक्तिः ।
अपि च वचनमेवं जातु लोके विरुद्धम् ॥
अमित कृतप्रयत्नैर्नष्टजातारिभावः ।
व्यवहरति हि शत्रुर्मित्रतुल्यो विनम्रः ॥ ३ ॥
भव भव मनुज, त्वं दत्तदृष्टिः स्वदेशे ।
भव भव मनुज, त्वं देशभक्तः सुवीरः ॥
भव भव मनुज, त्वं देशदासः प्रबुद्धः ।
भव भव मनुज, त्वं देशबंधुः सुवृत्तः ॥ ४ ॥

पिब पिब मनुज, त्वं देशभक्त्यर्कसोमम् ।
पिब पिब मनुज, त्वं देशसेवामृतं तत् ।।
पिब पिब मनुज, त्वं देशवात्सल्यसारम् ।
पिब पिब मनुज, त्वं शुद्धविज्ञानदुग्धम् ।। ५ ।।

卐 卐 卐

## अथ महात्मनः परदेशगमनम् ।

परदेशप्रयाणात् प्राग् शपथः मातृपादयोः ।
कृतो मोहनदासेन देशदासेन तेन च ॥ १ ॥
आंग्लदेशस्थितेनैव न कृतं मांसभक्षणम् ।
परस्त्रीगमनं तेन सुरापानं तथैव न ॥ २ ॥
कालान्तरेण जातोऽसौ कृतविद्यश्च पण्डितः ।
विधिज्ञस्य परीक्षायामुत्तीर्णश्च बभूव सः ॥ ३ ॥
पूर्णेंदुवदनाभिर्वा हिमसदृशकान्तिभिः ।
रूपगर्वितनारीभिः परिवेष्टित एव सः ॥ ४ ॥
उर्वशीमेनकारंभा शीतदेशसुरांगनाः ।
अग्रतः पार्श्वतस्तस्य तिष्ठन्ति मृगलोचनाः ॥ ५ ॥
तासां शृंगाररूपैर्वा मोहनो न च मोहितः ।
वीचयः पवनस्यैव गिरौ मूर्च्छन्ति नैव हि ॥ ६ ॥
विज्ञानभूषिते देशे शिष्टाचारसुमण्डिते ।
संपन्नगोरसे गौरे न्यवसन्मनमोहनः ॥ ७ ॥
आङ्ग्लदेशस्थिते तस्मिन् जननी पुतलापि च ।
परलोकं गता सैव कृत्वा तं गतमातृकम् ॥ ८ ॥

जीवन्त्यां वै जनन्यां च मातृसेवापरायणः ।
अथोत्तरं च जातोऽसौ मातृभूमिपरायणः ॥ ९ ॥

कृतविद्यार्जनो यावत् सुयशोवान् जितेन्द्रियः ।
स्वदेशदर्शनोत्कंठो भारतं पुनरागतः ॥ १० ॥

विधिज्ञो विधियुक्तोऽसौ विधिशास्त्रविशारदः ।
मोहनः कृतवासोऽपि मुम्बापुर्यामनन्तरम् ॥ ११ ॥

आयस्तु केशधारैव व्ययश्चांगुष्ठपृष्ठवान् ।
आयव्ययप्रमाणं हि पुर्यां व्यस्तं निगद्यते ॥ १२ ॥

व्यवसायो विधिज्ञस्य न तस्य रुचयेऽभवत् ।
भावं तथा न बध्नाति घृते मीनो यथा जले ॥ १३ ॥

षण्मासान्तेऽत्यजन्मुम्बानगरीं धनगर्विताम् ।
यतो वृत्तिर्वृता तेन स्ववृत्तिविमुखापि या ॥ १४ ॥

त्यक्त्वा मुम्बापुरीं प्राप्तौ राजकोटपुरं पुनः ।
स्थलान्तरं हि देहस्य वृत्तेर्जातं च नैव च ॥ १५ ॥

धनाढ्यो गुर्जरः कश्चित् राजकोटकृताश्रयः ।
चिन्ताविषण्न एवासौ प्राप्तो मोहनसंन्निधिम् ॥ १६ ॥

यस्य सत्यं हि सत्यास्ति चासत्यं सत्य वर्जितम् ।
अकिंचनो विधिज्ञः स्यात् निष्प्रभो न्यायमन्दिरे ॥ १७ ॥

हतःप्रज्ञस्यान्धस्य च मम मतिः स्थैर्यविमुखी
अहंकारेणापि स्वहितविटपः पातित इव ॥
असत् प्रवृत्तीनामथ दमनहेतोर्हि मनसः ।
रमे काव्यारामे त्वपिवरदरामेऽहमधुना ॥ १८ ॥

( अपूर्ण )

आषाढ शुद्ध प्रतिपदा शके
१८८१ कालिदास स्मृतिदिन
दिनांक ७-७-१९५९



सदर पुस्तकांच्या प्रति सर्व बुक डेपोमध्ये, तसेच खालील पत्त्यावर विकण्याची सोय केली आहे.

( १ ) **सौ. विमल गुप्ते**, रामबाग, ३ री गल्ली, कल्याण

( २ ) **सौ. विजया साठे**, ठाणे

( ३ ) **सौ. कमल भागवत**, नौपाडा, ठाणे

( ४ ) **श्री. रमाबाई काणे**, वसई, पारनाका

( ५ ) **सौ. विमल करमरकर**, गोरेगावकर बिल्डिंग, दादर

( ६ ) **सौ. मालती लागू**, ब्राह्मण कॉलनी, कुर्ला

( ७ ) **पुण्याचे एकमेव विक्रेते : यशवंत प्रकाशन,**
६८०।२३ सदाशिव, पुणे २



●

लौकरच तयार होत आहे.

●

श्री. प्रा. के. व्ही. बेलसरे यांचें

●

# ात्मदर्शन

अर्थात

# नाची रूपरेषा

